"राज्यातील स्वायत्त शासकीय / अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये" यांच्या करिता स्वतंत्र तंत्रशास्त्र विद्यापीठ स्थापन करण्यासंदर्भात अधिनियम तयार करण्याकरिता समिती गठित करणेबाबत..."

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण - ११११/(३६/२०)/तांशि-२**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ डिसेंबर, २०२१

संदर्भ : १. संचालक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे यांचा दिनांक १४ नोव्हेंबर, २०२१ रोजीचा ई मेल.
२. शासन निर्णय उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र. संकीर्ण - ११११/(१७१/२१)/तांशि-२, दिनांक ३० नोव्हेंबर, २०२१

**प्रस्तावना :**

शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेस स्वायत्तता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर संस्थेच्या नियामक मंडळाच्या दिनांक ११ नोव्हेंबर, २०२१ रोजी पार पडलेल्या ५० व्या बैठकीत "शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे (CoEP)" या संस्थेस एकाकी तंत्रशास्त्र विद्यापीठाचा दर्जा देण्याकरिता प्रस्तावित अधिनियमाचे प्रारूप संमत करण्यात आले आहे. सदर अधिनियमाच्या प्रारूपाची तपासणी करण्याकरिता संदर्भाधिन क्र. २ दिनांक ३० नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती गठित करण्यात आली होती. तथापि, अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे प्रमाणे इतरही स्वायत्त शासकीय / शासकीय अनुदानित अभियांत्रिकी संस्थांकडून तंत्रशास्त्र विद्यापीठ स्थापन करण्याबाबत प्रस्ताव प्राप्त होण्याची शक्यता असल्याने सर्वसमावेशक अधिनियम तयार करणे अधिक सुकर होईल. ही बाब लक्षात घेता राज्यातील स्वायत्त अभियांत्रिकी महाविद्यालयांकरिता स्वतंत्र तंत्रशास्त्र विद्यापीठ स्थापन करण्याकरिता सर्वमावेशक अधिनियमाचा मसुदा तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने, पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

संदर्भ क्र. (२) येथील दिनांक ३० नोव्हेंबर, २०२१ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

२. राज्यातील स्वायत्त शासकीय / अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये यांना स्वतंत्र तंत्रशास्त्र विद्यापीठ स्थापन करण्यासाठी सर्वसमावेशक अधिनियमाचे प्रारूप तयार करण्याकरिता पुढीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| डॉ. अभय वाघ, संचालक तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| श्री. सतिश ज. तिडके, उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| श्री. भूपेंद्र गुरव, निवृत्त सह सचिव, विधी व न्याय विभाग | सदस्य |
| श्री. डी. पी. गोमारे, निवृत्त विधी सल्लागार नि सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| श्री. आर. आर. बंगाले, निवृत्त सह सचिव (विधी), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| प्रा. एस. व्ही. जोशी, सेवानिवृत्त प्राध्यापक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अवसरी, जि. पुणे | सदस्य |
| श्री. नितीन जो. डंगारे, अवर सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

२. **समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील-**

**अ.** "शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे" या संस्थेच्या नियामक मंडळाने मान्यता दिलेल्या अधिनियमाच्या मसुद्याच्या आधारे राज्यातील स्वायत्तता प्राप्त असलेल्या व भविष्यात स्वायत्तता प्राप्त होणाऱ्या शासकीय / अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये यांच्या करिता स्वतंत्र तंत्रशास्त्र विद्यापीठ अधिनियम करण्यासंदर्भात सर्व समावेशक अधिनियमाचे प्रारूप तयार करणे.

**आ.** महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६; भारतीय तंत्रज्ञान संस्था (IIT) अधिनियम; विद्यापीठ अनुदान आयोग अधिनियम, १९५६; अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद अधिनियम, १९८७; डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ अधिनियम २०१४ यामधील तरतुदी विचारात घेऊन प्रस्तावित अधिनियमाच्या मसुद्याची तपासणी करणे.

**इ.** प्रस्तावित अधिनियमाचा कायदेशीर मसुदा तयार करणे (Legal Drafting)

**ई.** सदर समिती शिफारशींसह अधिनियमाचा सुधारित मसुदा ३१ डिसेंबर, २०२१ पर्यंत शासनास सादर करेल.

३. **समितीचे कामकाज**

सदर समितीचे कामकाज संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयात करण्यात येईल. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांनी समितीच्या कामकाजासाठी उचित व्यवस्था करावी.

४. **बैठक भत्ता व प्रवास भत्ता:**

समितीतील निवृत्त अधिकाऱ्यांना रू. ७०००/- प्रति बैठक याप्रमाणे बैठक भत्ता व प्रवासाचा प्रत्यक्ष खर्च अनुज्ञेय असेल. सदर खर्च शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेच्या स्वीय प्रपंजी खाते(PLA) मधून भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२०८११३२२७८४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Nitin Jotiram Dangare
Date: 2021.12.08 11:34:04 +05'30'

**( नितिन जो. डंगारे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. उपसचिव, तंत्रशिक्षण, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. डॉ. अभय वाघ, संचालक तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. श्री. भुपेंद्र गुरव, निवृत्त प्रभारी सचिव (विधी विधान), बंगला क्र. ७, शिवसंकल्प सोसायटी, गुरव कॉलनी, प्रगती कॉलनी जवळ, उपनगर नाशिक-४२२००६.

८. श्री. डी. पी. गोमारे, निवृत्त विधी सल्लागार नि सहसचिव, १०२, पहिला मजला, मजेठिया चेंबर, अब्दुल रझाक अल्लाना मार्ग, अल्लाना सेंटरजवळ, बर्मा बर्मा हॉटेल च्या पुढे, फोर्ट, मुंबई-४००००१.

९. श्री. आर. आर. बंगाले, निवृत्त सह सचिव (विधी), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

१०. प्रा. एस. व्ही. जोशी, सेवानिवृत्त प्राध्यापक, घर क्र. एन ८०२, बलवंतपुरम साम्राज्य, किनारा हॉटेल लेन, पॉड रोड, कोथरूड, पुणे-४११ ०३८.

११. निवड नस्ती.